**<u>भूसंपादन आस्थापना-पुणे विभाग</u>**

**मुंबई-पुणे द्रुतगती मार्गाकरिता जमीन संपादन करण्यासाठी निर्माण केलेल्या विशेष भूसंपादन अधिकाऱ्यांच्या पथकास दि. ०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.७/(ii)/अ-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०२ एप्रिल, २०२४.

**<u>वाचा</u>:-** १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. संकीर्ण-२०१८/प्र.क्र.७/(i)/अ-३,दि. ०६.१०.२०२३

२) शासन निर्णय क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१.०२.२०२४

३) विभागीय आयुक्त, पुणे विभाग यांचे क्र.विआपुणे/ निवाडा/आस्था/मु.वाढ-सन२०२४-२५/२८/२०२४, दि.२२.०२.२०२४ व क्र.भूसं/आरआर-१/कावि/९०/२०२४, दि.११.०३.२०२४ ची पत्रे.

**<u>प्रस्तावना</u> :-**

वित्त विभागाच्या संदर्भीय क्र.२ येथील दि.२१.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये, दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधी करीता अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करण्यात आलेले आहेत.

विभागीय आयुक्त, पुणे यांनी संदर्भीय क्र.३ येथील दि.२२.०२.२०२४ व दि.११.०३.२०२४ रोजीच्या पत्रान्वये, त्यांच्या अधिनस्त असलेल्या भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत शासनास विनंती केली आहे. यापूर्वी उपरोक्त संदर्भीय क्र.१ येथील दि.०६.१०.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर मुंबई-पुणे -द्रुतगती मार्गासाठी लागणारी खाजगी जमीन भूसंपादन अधिनियमांतर्गत संपादन करण्यासाठी व त्यानुषंगाने कर्मचाऱ्यांच्या पथकात/इतर भूसंपादनविषयक कामकाज हाताळण्यासाठी भूसंपादन अधिकाऱ्यांच्या कार्यरत पदांचा आकृतीबंध निश्चित झालेला नसल्यामुळे वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून विभागीय आयुक्त, पुणे यांचे अधिनस्त विभागातील भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मुंबई-पुणे द्रुतगती मार्गासाठी लागणारी खाजगी जमीन भूसंपादन अधिनियमांतर्गत संपादन करण्यासाठी व त्याअनुषंगाने इतर भूसंपादनविषयक कामकाज हाताळण्यासाठी भूसंपादन

अधिकाऱ्यांच्या/कर्मचाऱ्यांच्या पथकातील ११ अस्थायी पदांना शासनाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये दि. २९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता खालील तक्यातील सदर ११ अस्थायी पदांना पुढील अटी/शर्तीवर दि. ०१.०३.२०२४ ते ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देत आहे-

१) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदावरील अधिकारी / कर्मचारी यांना विभागामार्फत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागाकडील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

२) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते यांचे प्रदान कोणत्याही परिस्थितीत विभागातील कायम / स्थायी, अस्थायी पदांसाठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात येत नाही.

३) प्रस्तावाधीन प्रकरणामध्ये मुदतवाढ प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाही अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू ठेवलेले नाही. सदर शासन निर्णयातील तरतूदीस विसंगत कार्यवाही करण्यात आल्यास व त्यामुळे काही अडचणी उद्भवल्यास त्यास संबंधित कार्यालय जबाबदार राहील.

४) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

५) सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

०२. ही सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात यावी.

०३. सदरहू पदांवरील पदधारक शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | विशेष भूमी संपादन अधिकारी क्र.१ (द्रुतगती), पुणे | विशेष भूमी संपादन अधिकारी | १ |
| | | अव्वल कारकून | ३ |
| | | मंडळ अधिकारी | १ |
| | | लिपिक-नि-टंकलेखक | २ |
| | | भूकरमापक | १ |
| | | शिपाई | ३ |
| | | एकूण पदे | **११** |

०४. सदर पदांच्या आस्थापनेवर व त्या पदांना देण्यात येणाऱ्या सोई-सुविधांवर होणारा खर्च प्रथमत: मागणी क्र.सी-१,२०२९, जमीन महसूल-००१, संचालन व प्रशासन (०१) भूमी संपादन आस्थापना (योजनेतर) (०१) (०१) आयुक्त, कोकण-०१, वेतन (२०२९ ००४६) व (०१) (०३) आयुक्त, पुणे-०१, वेतन (२०२९ ००८२) या लेखाशीर्षाखाली टाकून तो खर्च २०२४-२०२५ या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व प्रत्यक्ष खर्च वर्षाअखेरीस संबंधित संपादक विभागाकडे (महसूल व वन विभागाखेरीज) वर्ग करण्यात यावा.

**०५.** हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना देण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्र २०२४०४०२१६५२२९४२१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MOHASIN
RAJMAHMAD SHAIKH

Digitally signed by MOHASIN RAJMAHMAD SHAIKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=613d5f4e81161c3485310241b06dd6ce7372ad8baf95f5ae576d53ac61afe62b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=74CDE6704F3FD0A42314F2424B55F3CFA18AE8A657DC2FC61B51901A90B029D5, cn=MOHASIN RAJMAHMAD SHAIKH
Date: 2024.04.02 17:02:06 +05'30'

**( मोहसिन रा.शेख )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
३) जिल्हाधिकारी, पुणे
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६) वित्त विभाग (व्यय-९)/अर्थसंकल्प-६)
७) नियोजन विभाग
८) सार्वजनिक बांधकाम विभाग
९) जलसंपदा विभाग
१०) अ-१, अ-२, अ-४, ब-१, ई-१, ई-३ कार्यासने, महसूल व वन विभाग
११) निवड नस्ती (अ-३)